सन २०१६-१७ या वित्तीय वर्षातील <u>अर्थसंकल्पित तरतुद वितरीत करण्याबाबत...</u>
**सहायक अनुदान**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- एमसीओ-२०१६/प्र.क्र.९६/नवि-१४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १६.०२.२०१७

**संदर्भ** :- १. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.- अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.०४.२०१६
२. शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र. एमसीओ-२०१६/प्र.क्र.९६/नवि-१४,दि. ०६.०५.२०१६
३. नगर परिषद प्रशासन संचालनालयाचे क्र. नपप्रसं/२०१६/नपा सहा.अनुदान/ प्र.क्र.१३३ /का-८ , दि. ०९.०१.२०१७

**प्रस्तावना :-**

राज्यातील नगरपरिषदांचा जकात कर व महागाई भत्ता रद्द केल्यामुळे त्याऐवजी सदर नगरपरिषदांना सहायक अनुदान वितरीत करण्यात येते. सदर प्रयोजनार्थ सन २०१६-२०१७ करीता रक्कम रू. १२९१.०० कोटी वित्त विभागाने अर्थसंकल्पित केलेले आहेत. वित्त विभागाने १००% निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करून दिला होता. तथापि, सदरचा निधी नगर परिषदा/ पंचायतींना कमी पडत असल्यामुळे वित्त विभागाने पुरवणी मागणीद्वारे रु. २००.०० कोटी वितरणाकरीता उपलब्ध करून दिले आहेत.

सन २०१६-१७ मधील प्राप्त अनुदान, शासन परिपत्रक, वित्त विभाग दि. २०.०४.२०१६ मध्ये विहित केलेल्या अटींची पुर्तता झाल्यावरच संबंधित नगर परिषदांना वितरीत करण्यात यावे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील नगरपरिषदांचा जकात कर व महागाई भत्ता रद्द केल्यामुळे त्याऐवजी सदर नगरपरिषदांना सहायक अनुदान देण्यात येते. सन २०१६-२०१७ करीता राज्यातील नगर परिषदांसाठी सहायक अनुदानाकरीता वितरण प्रणालीद्वारे प्राप्त झालेले अनुदान संबंधित नगर परिषदांना देय सहायक अनुदानाच्या प्रमाणात वितरीत करण्याकरीता नगर परिषद प्रशासन यांच्याकडे वितरीत करण्यात येत आहे.

२. संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय यांनी नगर परिषद प्रशासन संचालनालय स्तरावर निधी प्रत्यक्षपणे आहरित न करता तो अर्थस्ंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे संबंधित नियंत्रक अधिकारी यांना वितरीत करावा.

३. सदरचा निधी वितरीत करतांना शासन परिपत्रक, वित्त विभाग, दि. २०.०४.२०१६ मधील अटींची पुर्तता केल्यावरच तसेच ७५% उपयोगिता प्रमाणपत्र सादर केल्यावरच सदर निधी संबंधित नगर परिषदांना वितरीत करण्यात यावा.

४. सदरचा निधी मागणी क्रमांक- एफ-२, २२१७, नगरविकास, १९२, नगरपरिषदांना सहाय, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (००) (६०) जकात कर व महागाई भत्ता रद्द केल्यामुळे नगरपरिषदांना द्यावयाचे सहायक अनुदान, ३१ , सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२१७ ८०६६) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा.

५. महालेखापाल यांच्या संकेतस्थळावरील विवरणपत्रानुसार प्रलंबित उपयोगिता प्रमाणपत्रांचा आहरण व संवितरण निहाय निपटारा एक महिन्यात करण्याबाबत यावा. सदरची प्रमाणपत्रे अधिदान कार्यालयास सादर न करता ती महालेखापाल कार्यालयास सादर करावीत.

६. वित्त विभागाच्या संकेतस्थळावरील विवरणपत्रानुसार प्रलंबित संक्षिप्त देयकांचा निपटारा एक महिन्यात करण्यात यावा.

७. नगर परिषद प्रशासन संचालनालयाने अतिप्रदान झालेल्या रकमांची संबधित नगरपरिषदांकडून त्वरेने वसूली करावी. तसेच सदरची वसुली ९११, अतिप्रदानाची वसुली, (००) (०२) अतिप्रदानाची वसूली (योजनेतर) (२२१७९९५७) ७०, वजा वसुली या लेखाशिर्षाखाली करण्यात यावी.

८. सदरील आदेश वित्त विभागाच्या परिपत्रक क्र. अर्थस-२०१६/प्र.क्र. ८९/अर्थ-३, दि. २०.०४.२०१६ अन्वये दिलेल्या अधिकारीतेत निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२१७१७०७३२३९२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Jayasingrao N Patil
Date: 2017.02.17 17:09:16 +05'30'

**( ज.ना.पाटील )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
२. सर्व विभागीय आयुक्त,
३. सर्व जिल्हाधिकारी
४. सर्व मुख्याधिकारी
५. महालेखापाल (ले व अ) महाराष्ट्र -१ व २, मुंबई/नागपूर
६. महालेखापाल (ले.प.) महाराष्ट्र -१ व २, मुंबई/नागपूर
७. अधिदान व लेखा अधिकारी, (पूर्व) वांद्रे, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
८. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१०. कार्यासन व्यय-३/अर्थसंकल्प-१६/कोषा-५, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११.कार्यासन नवि-४/ कार्यासन न.वि.-३१, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. सचिव, यांचे विशेष कार्य अधिकारी (नवि-२)
१३. निवडनस्ती (नवि-१४) नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.